**राजभवन,पुणे येथे १ मे.वॅ. क्षमतेचा पारेषण संलग्न सौर विद्युत निर्मिती प्रकल्प उभारण्यासाठी हरित ऊर्जा निधीमधून आर्थिक तरतूद करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, उर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सौरप्र-२०१५/प्र.क्र.२२/ऊर्जा-७**
**मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक,**
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.
तारीख:- ३० मार्च, २०१७.

वाचा-

१) महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण, पुणे यांचे क्रमांक आरईएन/राजभवन/एस.पी.पी./२०१६-१७/सौर/२३९७, दिनांक २५ मे, २०१६ चे पत्र.

२) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.पूरक-२०१६/प्र.क्र.१२८/अर्थसंकल्प, दिनांक २० एप्रिल, २०१६ व दिनांक १२ ऑगस्ट, २०१६.

**प्रस्तावना :**

राजभवन,पुणे येथे १ मे.वॅ.क्षमतेचा पारेषण संलग्न सौर विद्युत निर्मिती प्रकल्प उभारण्यासाठी हरित ऊर्जा (Green Cess)निधीमधून आर्थिक तरतूद करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

राजभवन,पुणे येथे १ मे.वॅ.क्षमतेचा पारेषण संलग्न सौर विद्युत निर्मिती प्रकल्प उभारण्यासाठी रुपये ६,८७,९९,६४६/- (रु. सहा कोटी सत्त्याऐंशी लाख नव्याण्णव हजार सहाशे सेहेचाळीस) इतका निधी महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण, पुणे यांना वितरित करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर रक्कम अदा करण्यासाठी श्री.भि.य.मंता, उपसचिव, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी व श्री. वि.म. राजुरकर, अवर सचिव, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. सदर रु. ६,८७,९९,६४६/- (रु.सहा कोटी सत्त्याऐंशी लाख नव्याण्णव हजार सहाशे सेहेचाळीस फक्त) महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण, पुणे (Director General, Maharashtra Energy Development Agency, Pune) यांच्या नावे अदा करण्यात यावे.

४. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाची रक्कम केवळ महाऊर्जाने त्यांचे उपरोक्त संदर्भ क्रमांक १ अन्वये प्रस्तावित केलेल्या योजनांच्या अंमलबजावणीसाठीच खर्च करण्यात येईल याची खातरजमा महाऊर्जाकडून करण्यात यावी.

५. सदर अनुदान लेख्यासंबंधीची कागदपत्रे, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरणाने आवश्यक तेव्हा महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई यांच्याकडे तपासणीसाठी सादर करावीत.

६. याबाबतचा खर्च “ मागणी क्रमांक के-६, २८१० नवीन व नवीकरणीय ऊर्जा साधने,राज्य योजनांतर्गत योजना, (००)(०५) महाराष्ट्र ऊर्जा विकास निधीतून भागविलेला खर्च, (२८१० ०१२३) ५० इतर खर्च,

योजनांतर्गत" या लेखाशीर्षाखाली सन २०१६-१७ या आर्थिक वर्षासाठी मंजूर असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

७. सदर शासन निर्णय, नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २१३/१४६१, दिनांक २३.६.२०१६ अन्वये व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ९९/२०१७, दिनांक २३.३.२०१७ अन्वये प्राप्त झालेल्या त्या त्या विभागाच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

८. महाराष्ट्र विनियोजन विधेयक-२०१६ वित्त विभाग,परिपत्रक क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक २०/४/२०१६ च्या परिपत्रकातील मु.क्र. ७ ते १८ मधील प्रत्येक अटींची तसेच त्यासोबतच्या परिशिष्टातील मु.क्र. ३ ते ९ मधील अटींची, वित्त विभागाच्या दि. १०/५/२०१६ च्या परिपत्रकातील अटींची व वित्त विभागाच्या दि. १२/८/२०१६ च्या परिपत्रकातील अटींची पूर्तता महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण यांना सन २०१६-१७ साठी अनुदान वितरीत करताना होत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३३०१९११४४२०१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rohini P Jadhav

Digitally signed by Rohini P Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOURS DEPT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=12646d8130730515a2533ddd2b46b2c82ca9b32dbbcd3d60f21e82f7cc2ee090, cn=Rohini P Jadhav
Date: 2017.03.31 09:52:35 +05'30'

**( रो.प्र.जाधव )**
अवर सचिव,महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण, म्हाडा कमर्शियल कॉम्पलेक्स,सर्व्हे नं.१९१- ए फेज, येरवडा, पुणे- ४११ ००६.
२) महालेखापाल, महाराष्ट्र-१ ( लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), मुंबई.
३) महालेखापाल, महाराष्ट्र-२,( लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा), नागपूर.
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५) वित्त विभाग, व्यय-१६/अर्थसंकल्प-३, मंत्रालय,मुंबई-३२.
६) नियोजन विभाग, का-१४६१, मंत्रालय, मुंबई-३२.
७) अवर सचिव ( रोख शाखा /प्रशासन)उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
८) अवर सचिव(ऊर्जा-३),उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
९) निवड नस्ती( ऊर्जा-७), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.